आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय यांना असलेले प्रशासकीय व वित्तीय बाबींसदर्भातील अधिकार संचालनालयाच्या उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार व संचालनालयाच्या विविध कक्षातील सहाय्यक संचालक, रोजगार व स्वयंरोजगार यांना प्रदान करणे आणि आयुक्तांच्या मान्यतेने कार्यालयाचे आदेश निर्गमित करण्याबाबतची कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन

रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
शासन निर्णय क्रमांकःइएसई-२००९/प्र.क्र.६३/प्रशा-२,
नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ३० सप्टेंबर, २०११.

संदर्भ : समक्रमांकाच्या दिनांक २९/०७/२००९ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना**

आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, हे रोजगार व स्वयंरोजगार संचालनालयाचे विभाग प्रमुख असल्याने त्यांना बेरोजगार उमेदवारांबाबतच्या विकास योजना व धोरणात्मक कामाकडे लक्ष देणे शक्य व्हावे व सदर योजना परिणामकारकरित्या राबविण्याच्या दृष्टीने त्यावर अधिक लक्ष देता यावे यासाठी त्यांची नित्याच्या कामातून मुक्तता व्हावी म्हणून आयुक्तांना प्रदान करण्यात आलेले अधिकार उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय व संचालनालयाच्या विविध कक्षातील सहाय्यक संचालक, रोजगार व स्वयंरोजगार यांना पुनः प्रत्यायोजित करण्याबाबत संदर्भाधीन दिनांक २९/०७/२००९ रोजी शासन निर्णय निर्गमित केला होता. आता आयुक्तांच्या मान्यतेने संचालनालयातील प्रशासकीय अधिकार व वित्तीय अधिकार संचालनालयातील उपसंचालक, क्षेत्रिय आस्थापनेवरील विभागीय मुख्यालयातील संबंधित उपसंचालक आणि संचालनालयातील संबंधित कक्ष प्रमुख/सहायक संचालक यांना प्रदान केल्याने सदर कामकाजाचे अधिक सुलभिकरण होईल. त्यामुळे, अधिकार प्रदान करण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांच्याकडील प्रशासकीय अधिकार व वित्तीय अधिकार संचालनालयाच्या उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार, क्षेत्रिय आस्थापनेवरील विभागीय मुख्यालयातील संबंधित उपसंचालक आणि संचालनालयातील संबंधित कक्ष प्रमुख/सहायक

संचालक यांना या शासन निर्णयाच्या सोबतच्या परिशिष्ट 'क' मध्ये दर्शविल्याप्रमाणे पुनः प्रत्यायोजित करण्यात येत आहे. तसेच, परिशिष्ट 'क' मध्ये विहित केल्याप्रमाणे आयुक्तांच्या मान्यतेने कार्यालयाच्या कामकाजाची कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे. सदर परिशिष्टांमध्ये नमूद न केलेले अधिकार आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांच्याकडे राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५/०५/२००९ अन्वये मुंबई वित्तीय नियम,१९५९ अंतर्गत नियमांखाली प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारीतील भाग पहिला, उपविभाग एक च्या अनुक्रमांक १ नियम क्रमांक २ खाली प्रशासनिक विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९३०१३२५०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

-सही-
(श.मा.साठे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

सहपत्रः- परिशिष्ट 'क'

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालये,
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे,
सर्व विद्यापीठ रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्रे,
सर्व आदिवासी उमेदवारांकरीता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्रे,
अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे, मुंबई,
रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्रे (तांत्रिक), मुंबई / पिंपरी, पुणे,
वित्त विभाग, (विनियम) मंत्रालय, मुंबई-३२
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
उपकोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
निवड नस्ती.

**''परिशिष्ट - क''**

**शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,**

**क्रमांकःइएसई-२००९/प्र.क्र.६३/प्रशा-२, दिनांक ३० सप्टेंबर, २०११ चे सहपत्र.**

आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांना असलेले प्रशासकीय व वित्तीय बाबींसदर्भातील अधिकार संचालनालयातील उपसंचालक, क्षेत्रिय आस्थापनेवरील विभागीय मुख्यालयातील संबंधित उपसंचालक आणि संचालनालयातील संबंधित कक्ष प्रमुख/सहायक संचालक प्रदान करणे आणि आयुक्तांच्या मान्यतेने कार्यालयाचे आदेश निर्गमित करण्याबाबतची कार्यपध्दती

| **अ. क्र.** | **आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार यांचे अधिकारातील कामकाज** | **प्रत्यायोजित करावयाचे कामकाज व कार्यपध्दती** |
|---|---|---|
| १ | निविदा, सूचना प्रसिध्द करणे/बांधकाम, प्रकल्प इ. कामे सुरु करणे (वर्क ऑर्डर)/खरेदी आदेश (पर्चेस ऑर्डर) इ. यावर स्वाक्षरी करणे. | आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांच्या मान्यतेने उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय |
| २ | मुंबई नागरी सेवा नियम, १९५९ अन्वये देण्यात आलेल्या व प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारामध्ये शासन निर्णय, वित्त विभाग क्र.एमआयएस-१०७६/सीआर १३९५/एसईआर-७, दिनांक १९/०४/१९७७ अन्वये करण्यात आलेल्या सुधारणांनुसार सदर शासन निर्णय यासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील अनु.क्र.१६ अन्वये अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षणास पाठविण्यास मंजुरी देणे तसेच मंजुरी आदेश निर्गमित करणे. | |
| ३ | प्रशिक्षणावरील वरील आकस्मिक खर्च/प्रवास खर्च, दैनिक भत्ता इ.मंजुरी देणे तसेच मंजुरी आदेश निर्गमित करणे. | |
| ४ | संगणक यंत्रणा (प्रिंटर, स्कॅनर इ.) युपीएस, इनर्व्हटर, झेरॉक्स मशीन, फॅक्स मशीन, ईपीएबीएक्स इ. बाबत देखभालीच्या करारनाम्यांवर स्वाक्षरी करणे. | |
| ५ | रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील विभागीय मुख्यालयाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या सहायक संचालक, गट-अ यांच्या अर्जित रजा/परिवर्तित रजा/महाराष्ट्र दर्शन रजा प्रवास सवलत/स्वग्राम रजा प्रवास सवलत तसेच, राज्यांतर्गत शासकीय दौरा मंजूर करणेबाबत. | संबंधित उपसंचालक, विभागीय मुख्यालय |
| ६ | रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील कनिष्ठ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-क यांचे गोपनीय अहवाल संकलीत करणे आणि त्यावर संस्करण करणे. | |

| | | |
|---|---|---|
| ७ | संचालनालयातील स्तरावर प्राप्त होणारी केंद्र/राज्य शासनाची रिक्त पदे संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयात प्रसिध्दी/पुढील कार्यवाहीस्तव पाठविणे व विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करणे. | संचालनायातील संबंधित कक्ष प्रमुख / सहायक संचालक |
| ८ | उमेदवारांच्या नोकरीबाबतचे अर्ज, तक्रारी इ. (आत्महत्या/उपोषण वगळून) | |
| ९ | राज्य शासन किंवा केंद्र शासनास पाठविण्यात येणा-या नियमित विवरणपत्रांवर स्वाक्षरी करुन पाठविणे. | |
| १० | संचालनालयाच्या अधिपत्याखालील कार्यालयांकडून नियमित विवरणपत्रांची माहिती तसेच संचालनालयास वेळोवेळी लागणारी आवश्यक माहिती संकलित करणेबाबतचा पत्रव्यवहार. | |
| ११ | मंत्रालयाशिवाय इतर सर्व कार्यालये/खाजगी संस्था यांच्याकडे पाठविण्यात येणारी संकीर्ण पत्रे इ. पत्रव्यवहार करणे व त्यावर स्वाक्षरी करणे. | |